DATRA-4\planyearly distri forwarding.lw;

प्रति,

परिवहन आयुक्त,
महाराष्ट्र राज्य,
मुंबई.

क्रमांक:एमव्हीडी-१२०२/सीआर-२२६/परि-४, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: - २२ जुलै, २००३

विषय:- मोटार वाहन विभागाच्या विविध कार्यालयीन इमारत बांधकामासाठी वित्तीय वर्ष २००३-२००४ मध्ये मंजूर झालेले अनुदान.

संदर्भ : शासन निर्णय,सा.बां.वि.क्र.बीजीएम २००३/प्र.क्र.(७५)/अर्थ-२, दि.१८.७.२००३

वित्तीय वर्ष २००३-२००४, महाराष्ट्र विधानमंडळाचे मार्च, २००३ च्या अधिवेशनात -४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च -०१-कार्यालयीन इमारती १०१-बांधकाम -वाहतुक-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशिर्षाखाली सार्वजनिक बांधकाम विभागाला मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीचे नियंत्रक अधिकारीवार / कामवार वाटप अर्थसंकल्पिय अंदाज कल्पित २००४ भाग तीन परिशिष्टे या अंदाजपत्रकीय प्रकाशनात दाखविले आहे. (सोबत विवरणपत्र जोडलेले आहे) प्रस्तव तरतुद सार्वजनिक बांधकाम विभागातील संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांकडे उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयान्वये सुपुर्द करण्यात आली आहे. त्याप्रमाणे सन २००३-२००४ या वित्तीय वर्षात सदरे तरतुद खर्च करण्यास अनुमती देण्यात येत आहे. वित्त विभागाच्या अ.शा. पत्र क्रमांक संकीर्ण १०.०३/ प्र.क्र.७/अर्थोपाय दि.१८.६.२००३ च्या अन्वये राज्य योजनांतर्गत तरतुदीपैकी ५५% तरतुद वितरीत करण्याच्या सूचना दिल्या आहेत. त्यानुसार सोबत जोडलेल्या मंजूर तरतूदीपैकी ५५% तरतुदीचे वितरण करावे. सादर बांधकामे ज्या ज्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या कक्षेत येत असतील त्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रक अधिकाऱ्यांशी संपर्क साधून कामांची पूर्तता करुन घ्यावी. प्रत्येक वेळी कामाची प्रगती व अहवाल सादर करण्याची जबाबदारी त्या अधिकाऱ्यांवर असेल याची कृपया नोंद घ्यावी. आपण केलेली कार्यवाही त्वरित शासनास कळवावी.

( सा.र.वाघमारे )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत :- [illegible]
~~प्रादेशिक परिवहन अधिकारी, मुंबई (पश्चिम), अंधेरी~~
~~उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा.~~
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, रत्नागिरी.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, जालना.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सिंधुदुर्ग.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, कोल्हापूर.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, लातूर.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, उस्मानाबाद.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, गोंदीया.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सोलापूर.
उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, चंद्रपूर.
सार्वजनिक बांधकाम विभाग, अर्थसंकल्प-२, मंत्रालय, मुंबई.

**४०५९.सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च या लेखाशिर्षाखालील**
**मोटार वाहन विभागाच्या इमारत बांधकामास**
**२००३-२००४ मध्ये प्रस्तावित केलेला निधी.**

| बांधकामाचे नांव | सन २००३-२००४ मध्ये केलेली तरतूद |
|---|---|
| अधिक्षक अभियंता मुंबई. | |
| प्रादेशिक परिवहन अधिकारी, मुंबई अंधेरी (पश्चिम) मुंबई अतिरिक्त बॅरेक्स आणि कंपाऊंड भिंत. | रु.१,००,००० |
| अ.अ. ठाणे<br>प्रादेशिक परिवहन कार्यालय,ठाणे येथे संगणक कक्ष बांधणे | रु.१,५०,००० |
| अ.अ.रत्नागिरी<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,, रत्नागिरी कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे. | रु.१,००,००० |
| उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सिंधुदुर्ग नवीन कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे. | रु.१०,००,००० |
| अ.अ.कोल्हापूर<br>कोल्हापूर जिल्ह्यातील कागल येथे कार्यालय इमारतीचे बांधकाम करणे व सीमा तपासणी चौकी येथे वाहनकाटा बसविणे. | रु.१,००,००० |
| अ.अ. सोलापूर<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सोलापूर नवीन कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे. | रु.४,००,००० |
| अ.अ.सातारा<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा कार्यालयात फर्निचर करणे | रु.१,००,०००<br>रु.१,५०,००० |
| अ.अ.औरंगाबाद<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, जालना कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे | रु.२,००,००० |
| अ.अ.उस्मानाबाद<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, उस्मानाबाद कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे<br>उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, लातूर कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे | रु.५,००,०००<br>रु.८,००,००० |
| अ.अ.नागपूर<br>उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, गोंदिया, नवीन कार्यालय इमारतीचे बांधकाम करणे. | रु.६,३०,००० |
| उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, चंद्रपूर नवीन कार्यालय इमारतीचे बांधकाम करणे | रु.६,००,००० |
| बांधकामाचा खर्च<br>आस्थापना खर्च<br>हत्यारे, सयंत्र खर्च | रु. ४८,३०,०००<br>रु. ६,५८,०००<br>रु. ५२,००० |
| एकूण | रु. ५४,४०,००० |